**सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात मंजूर तरतुदीमधून राज्यातील कारागृहामध्ये व्हिडीओ कॉन्फरंन्सींगव्दारे बंद्यांना मा.न्यायालयात हजर करणे कामेकरिता आवश्यक उपकरणे खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१११८/प्र.क्र.१८८/तुरुंग-२**

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २१ डिसेंबर, २०१८.

वाचा-

१) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. मेंटेनन्स/व्हिडीओ कॉन्फरंन्सींग उपकरणे/१०७९०/२०१८-१९/कक्ष-६ दिनांक १४ नोव्हेंबर,२०१८.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८.
३) शासन निर्णय, उद्योग,उर्जा व कामगार विभाग, क्र.संकीर्ण २०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४ दिनांक २४ ऑगस्ट २०१७.
४) शासन निर्णय, उद्योग,उर्जा व कामगार विभाग क्र. भांखस २०१७/प्र.क्र.२०४/उद्योग-४, दिनांक ०८ डिसेंबर,२०१७
५) वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२ दिनांक १७ एप्रिल,२०१५

प्रस्तावना :-

सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात मंजूर तरतुदीमधून राज्यातील कारागृहामध्ये व्हिडीओ कॉन्फरंन्सींगव्दारे बंद्यांना मा.न्यायालयात हजर करणे कामेकरिता आवश्यक उपकरणे खरेदी करीता रू.३.००/- कोटी (रुपये तीन कोटी फक्त) अनुदान अर्थसंकल्पित करण्यात आलेले आहे.त्यापैकी संदर्भ क्र.१ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार रु. **२,९९,९६,७१०/-**इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता व निधी खर्च करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

राज्यातील कारागृहामध्ये व्हिडीओ कॉन्फरंन्सींगव्दारे बंद्यांना मा.न्यायालयात हजर करणे करिता आवश्यक उपकरणे खरेदी करीता संदर्भ क्र.१ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन मंजूरी देण्यात येत आहे.

१. सदर खरेदी उद्योग,उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४ दिनांक २४ ऑगस्ट २०१७ व शासन निर्णय, उद्योग,उर्जा व कामगार विभाग क्र. भांखस २०१७/प्र.क्र.२०४/उद्योग-४, दिनांक ०८ डिसेंबर,२०१७ मधील नमुद तरतुदींच्या अनुषंगाने विहित पद्धतीचा अवलंब करुन केली जाईल याची काटेकोरपणाने खात्री करावी.

२. उपकरणाचे खरेदीमुल्य बाजारभावापेक्षा अधिक राहणार नाही तसेच उपकरणाचा दर्जा उच्च प्रतीचा राहील, याची खात्री करावी.

राज्यातील कारागृहामध्ये व्हिडीओ कॉन्फरंन्सींगव्दारे बंद्यांना मा.न्यायालयात हजर करणे कामेकरिता खरेदी करण्यात येणारे आवश्यक उपकरणे /सामग्री दर्शविणारी यादी :-

| अ.क्र. | उपकरणाचे नांव | आवश्यक नग | अंदाजे किंमत प्रति नग | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| १ | ४८ इंच एल.एफ.डी. टिव्ही (१० मिटर एच.डी.एम.आय. /व्ही.जी.ए. केबल सह) | २९९ | ६०,०००/- | १,३७,०३,३६० |
| २ | लॅपटॉप (कोअर-आय ५) | २९९ | ५१२५०/- | १,१७,३६,२५०/- |
| ३ | एच डि कॅमेरा / माईक /स्पिकर | २९९ | १९९००/- | ४५,५७,१००/- |
| **एकूण** | | | | **२,९९,९६,७१०/-** |

२. वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ भाग पहिला, उप विभाग २ मधील अ.क्र ४ नियम ७ च्या मधील अटीस अधीन राहून प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

३. सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात मंजूर तरतुदीमधून राज्यातील कारागृहामध्ये व्हिडीओ कॉन्फरंन्सींगव्दारे बंद्यांना मा.न्यायालयात हजर करणे करिता आवश्यक उपकरणे खरेदी करीता उपलब्ध अर्थसंकल्पित अनुदान रकमेपैकी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/ अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल,२०१८ मध्ये नमूद केलेल्या निधीच्या मर्यादेत या वर्षी खर्च करण्यास शासन मंजूरी देत आहे.

४. यावरील होणारा खर्च मागणी क्र. मागणी क्र बी-५, मुख्य लेखाशिर्ष २०५६ तुरुंग (००)(१०१) तुरूंग (००)(१९) तुरूंगातील व्हिडीओ कॉन्फरंन्सींग सुविधा (२०५६ ०२४२) (१३) कार्यालयीन खर्च या लेखा शीर्षाखाली उपलब्ध होणा-या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२११७३७५६१७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Siddharth Vidyadhar Dhandore

Digitally signed by Siddharth Vidyadhar Dhandore
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=18c12c8352414c8a8937fd0998c9ca8d81b7ea489acfd971bb6de950e8d1d54f, serialNumber=5d16166df09e111cba9c7d5e4e321b340111df7b21c5b0fff0be638e80ea9a1b, cn=Siddharth Vidyadhar Dhandore
Date: 2018.12.21 17:42:03 +05'30'

**( सि.वि.धांडोरे )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, कारागृह, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक,कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) विशेष पोलीस महानिरीक्षक, कारागृह (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), दक्षिण विभाग, भायखळा, मुंबई.
५) कारागृह उपमहानिरीक्षक, (पश्चिम विभाग)/पूणे,
६) कारागृह उपमहानिरीक्षक, (मध्य विभाग)/औरंगाबाद,
७) कारागृह उपमहानिरीक्षक, (पूर्व विभाग)/नागपूर,
८) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य १ मुंबई,
९) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य १ मुंबई,
१०) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य २ नागपूर,
११) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य २ नागपूर,
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१३) अवर सचिव, वित्त विभाग,(व्यय ८/अर्थसंकल्प ११) मंत्रालय, मुंबई-३२,
१४) अवर सचिव (बीयुडी-१) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,
१५) निवड नस्ती (तुरुंग-२).